महाविद्यालय हस्तांतरण, एकत्रीकरण,
नुतनीकरण करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्रशिक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांकः एनजीसी-२०१०/(१८४/१०) मशि-४
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०००३२.
दिनांक : ३१ ऑगस्ट, २०१०.

**प्रस्तावना** :- राज्यातील उच्च शिक्षण क्षेत्रात काम करणाऱ्या अनेक संस्थांकडून एका संस्थेचे महाविद्यालय दुस-या संस्थेस हस्तांतरीत करणे, बंद पडलेल्या किंवा सुरु न केलेल्या महाविद्यालयाचे नुतनीकरण व दोन महाविद्यालयाचे एकत्रिकरण करण्याबाबत शासनाकडे अनेक प्रस्ताव येत असतात. महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ च्या कलम ९२(६) मधील तरतूदीनुसार विद्यापीठाने यासंबंधात विहित केलेली कार्यपध्दती अनुसरल्यानंतर राज्यशासनाच्या पुर्व परवानगीने एका संस्थेचे महाविद्यालय दुसऱ्या संस्थेकडे हस्तांतरीत करण्यात येते. परंतु महावद्यालयाचे नुतनीकरण व दोन महाविद्यालयाचे एकत्रीकरण करण्याबाबत महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम १९९४ मध्ये कोणतीही तरतूद नाही. त्यामुळे या संदर्भात शासनाकडे प्राप्त झालेल्या निवेदन/प्रस्तावावर विचार करणे अडचणीचे ठरते. त्यामुळे महाविद्यालयाचे नुतनीकरण व दोन महाविद्यालयाचे एकत्रीकरण करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय** :-

१. १) एकाच संस्थेचे कनिष्ठ व वरिष्ठ महाविद्यालय हे एकाच इमारतीमध्ये असेल तर या दोन्ही महाविद्यालयाचे एकत्रीकरण करता येईल.

२) एकाच संस्थेचे वरिष्ठ पारंपारीक व वरिष्ठ व्यावसायीक महाविद्यालय एकाच इमारतीमध्ये असेल किंवा दोन्ही महाविद्यालयाचा परिसर एकच असेल तर या दोन्ही महाविद्यालयाचे एकत्रीकरण करता येईल.

३) सन २००१ पूर्वी जी महाविद्यालये, विद्याशाखा, अभ्यासक्रम / विषय इ. विना अनुदान तत्वावर मंजूर करण्यात आलेली होती मात्र ती सुरु झालेली नाहीत त्यांना तद्नंतरच्याकाळात सुरु करण्यासाठी नुतनीकरणास परवानगी देताना ती कायम विना अनुदानित तत्वावर मंजूर करण्यात यावीत. तथापि, ज्या महाविद्यालयांना, अभ्यासक्रम / विषयांना, विद्याशाखा इत्यादींना मूळातच कायम विना अनुदान तत्वावर मंजूरी दिलेली आहे, त्यांनी महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियमाच्या कलम ८२ (५) च्या दुसऱ्या परंतुकामध्ये नमुद तरतुदीनुसार कार्यवाही करावी.

२.	वरील अनुक्रमांक १), २) व ३) येथील प्रस्ताव रितसर विद्यापीठाच्या शिफारशीसह संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेकडुन प्रस्ताव प्राप्त झाल्यास शासन स्तरावर मंजूरीसाठी विचारात घेण्यात येतील.

३.	हे आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळ www.maharashtra.gov.in वर ठेवण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१००९०३१४५०१९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(वि. गो. चांदेकर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,
१. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण.
३. सर्व अकृषि विद्यापीठ.
४. निवड नस्ती मशि-४.